सार्वजनिक आरोग्य विभागातील वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या वार्षिक गोपनीय अहवालांचे प्रतिवेदन, पुनर्विलोकन तथा जतन करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**

# शासन परिपत्रक क्रमांकः गोपन २०१५/प्र.क्र.३०/सेवा २

गो.ते. रुग्णालय, संकुल इमारत, दहावा मजला
मंत्रालय,मुंबई ४००००१
दिनांक : १६ जुलै,२०१५

**वाचा -**

1) **शासन निर्णय क्रमांकः , सा.प्र.वि. क्र. सीएफआर-१२१०/प्र.क्र.४७/२०१०/तेरा, दि.०१.११.२०११.**
2) **शासन पत्र समक्रमांक दि.२१.११.२०१३.**

## शासन परिपत्रक

शासकीय अधिकारी / कर्मचारी यांचे गोपनीय अहवाल लिहीणे व जतन करणे याबाबत एकत्रित सूचना सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णय क्रमांक सीईआर/१२१०/सीआर-४७/२०१०/१३,दिनांक १.११.२०११ च्या शासन निर्णयाव्दारे देण्यात आल्या आहेत. सदर शासन निर्णयातील परिशिष्ट "अ" मध्ये या सूचना समाविष्ट आहेत. सदर शासन निर्णया सोबत सहपत्र २ म्हणून गोपनिय अहवाल लिहण्याबाबतचे वेळापत्रक जोडण्यात आलेले आहे या वेळापत्रकानूसार प्रतिवेदन अधिकाऱ्यांनी गोपनीय अहवाल लिहून दरवर्षी दि.३० एप्रिल च्या आत पुनर्विलोकन अधिकाऱ्याकडे पाठविले पाहिजे. तसेच पुनर्विलोकन अधिकाऱ्यांनी गोपनीय अहवाल पुर्नविलोकित करुन दि. १५ मे पर्यत ते संस्करण अधिकाऱ्याकडे पाठवावयाचे आहेत. गोपनिय अहवालाचे संस्करण करण्याची कार्यवाही वेळीच न केल्यास संबंधित आस्थापना अधिकाऱ्यास किंवा वेळीच कार्यवाही पूर्ण न करण्यास कारणीभूत ठरलेल्या अधिकाऱ्यास / कर्मचाऱ्यास जबाबदार धरुन त्यांचे विरुध्द योग्य ती कार्यवाही करण्याच्या सूचना आहेत.

वरील वेळापत्रकाप्रमाणे कार्यवाही पूर्ण केली असल्याबाबत प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणुन प्रधान सचिव (सा आ व कु क) यांना प्रमाणित करावे लागते. या संबंधीच्या सूचना दि. २१ जानेवारी, २०१३ रोजी संचालक राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान व संचालक आरोग्य सेवा यांच्या निदर्शनास आणण्यात आल्या आहेत. तथापि, या संबंधी विहित मुदतीत कार्यवाही पूर्ण होत नाही अशी बाब निदर्शनास आली आहे. एवढेच

नव्हे तर, प्रधान सचिव (सा आ व कु क) यांनी प्रतिवेदन करावयाचे व पुर्नविलोकीत करावयाचे गोपनीय अहवालही विभागास प्राप्त झालेले दिसून येत नाहीत.

याबाबतीत सर्व संबंधितांना सूचना देण्यात येत आहेत की,

१. गोपनीय अहवाल प्रतिवेदित करणे, पुर्नविलोकित करणे या संबंधीच्या सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णयाची प्रत सोबत जोडली आहे. त्यातील सर्व सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. सदर सूचनांचे पालन न झाल्यास संबंधित अधिकाऱ्यांची प्रतिवेदन वर्षाच्या नंतरच्या वर्षातील १ जुलैला अनुज्ञेय होणारी वेतनवाढ रोखण्यात येईल याची नोंद घ्यावी. तसेच, संबंधित अधिकाऱ्यांना शिस्तभंगविषयक कारवाईस सामोरे जावे लागेल याची गांभीर्याने नोंद घ्यावी.

२. सार्वजनिक आरोग्य विभागातील कार्यरत असणाऱ्या वरिष्ठ अधिकाऱ्यांचे वार्षिक गोपनीय अहवालांचे प्रतिवेदन व पुनर्विलोकन सोबतच्या परिशिष्ट - अ मध्ये दर्शविल्याप्रमाणे करण्यात यावे.

३. जवळच्या नातेवाईकांच्या अथवा कुटुंबातील व्यक्तीच्या प्रत्यक्ष अधिपत्त्याखाली अधिकारी / कर्मचारी कार्यरत असेल तर त्यांचे गोपनिय अहवाल कुटुंबातील व्यक्ती वा जवळच्या अशा प्रकरणी पुनर्विलोकन अधिकारी प्रतिवेदन अधिकाऱ्यांची .नातेवाईकाने लिहू नयेत भूमिका पार पाडेलजिथे पुनर्विलोकन अधिकाऱ्यांच्या जवळच्या नातेवाईकांच्या गोपनीय . अहवालाचे पुनर्विलोकन करावयाचे असेल अशा ठिकाणी पुनर्विलोकन अधिकाऱ्याची भूमिका अशा प्रकारच्या .पुनर्विलोकन करणाऱ्या अधिकाऱ्याच्या लगतच्या वरिष्ठ अधिकाऱ्याने करावी ज्या प्रकरणांमध्ये शंका आहे तिथे प्रतिवेदक अधिकारी यांनी गोपनिय अहवाल प्रतिवेदित करण्यापूर्वी त्यांच्या लगतच्या वरिष्ठ अधिकाऱ्याचा सल्ला घेणे बंधनकारक असेल.

४. उपसंचालक व त्यावरील दर्जाच्या अधिकाऱ्यांच्या गोपनीय अहवालांचे संकलन व जतन करण्यासाठी अवर सचिव (सेवा-२) यांना संस्करण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. या गोपनीय अहवालांचे संकलन व जतन करणे ही त्यांची जबाबदारी राहील.

५. उपसंचालक व त्यावरील दर्जाच्या अधिकाऱ्यांच्या सन २०१०-११ पासून आजपर्यंतच्या गोपनीय अहवालांचे संगणकीकरण करुन (स्कॅन) सर्व विभागप्रमुखांनी इलेक्ट्रॉनिक स्वरुपात कार्यासन सेवा-२ यांना या परिपत्रकाच्या दिनांकापासून १५ दिवसात (कॉम्पॅक्ट डिस्क वर) सादर करावेत.

६. सदर शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभागाने अनौपचारीक संदर्भ क्र ,(सेवा) अमुस/९३५ . दिनांक .अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे ४.७.२०१५

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१५०७१३१५०८४५८४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GHODKE VISHNUDAS PUNDLIKRAO

Digitally signed by GHODKE VISHNUDAS PUNDLIKRAO
DN: CN = GHODKE VISHNUDAS PUNDLIKRAO, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = PUBLIC HEALTH,CID - 918117
Date: 2015.07.17 16:23:59 +05'30'

**(वि.पुं.घोडके)**
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. मुख्य सचिव
२. आयुक्त, कुटुंब कल्याण तथा संचालक राष्ट्रीय आरोग्य अभियान मुंबई,
३. आयुक्त राज्य कामगार विमा योजना,मुंबई
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, राजीव गांधी जीवनदायी योजनामुंबई,
५. संचालक आरोग्य सेवामुंबई,
६. प्रकल्प संचालक, महाराष्ट्र एडस् नियंत्रण सोसायटीमुंबई,
७. अतिरिक्त संचालक( सर्व) आरोग्य सेवा ,
८. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा ,(सामाजिक बांधिलकी असलेले कार्यक्रम)पुणे
९. सहसंचालक(सर्व) आरोग्य सेवा ,
१०. सहसंचालक आरोग्य सेवा ,(कुष्ठ व क्षय बीसीजी) पुणे ,
११. सहसंचालकआरोग्य सेवा , (हिवताप, हत्तीरोग व जलजन्य रोग) पुणे,
१२. उपसंचालकआरोग्य सेवा , (कुटुंब कल्याण) पुणे,
१३. सर्व उपसंचालक, आरोग्य सेवा संचालनालय / परिमंडळे / परिवहन / माहिती /शिक्षण व संपर्क / कुष्ठरोग व क्षयरोग / हिवताप, हत्तीरोग व जलजन्य रोग / सांख्यिकी
१४. मा मंत्री (आरोग्य) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१५. मा राज्यमंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१६. प्रधान सचिव (आरोग्य) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१७. सह सचिव (सेवा-२) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१८. सर्व उपसचिव यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई
१९. निवड नस्ती (सेवा-२)

**परिशिष्ट -अ**

| अ.क्र. | पदनाम | प्रतिवेदन अधिकारी | पुनर्विलोकन अधिकारी |
|---|---|---|---|
| १ | आयुक्त कुटुंब कल्याण तथा संचालक राष्ट्रीय आरोग्य अभियान | प्रधान सचिव (सा आ व कु क) | मुख्य सचिव |
| २ | आयुक्त राज्य कामगार विमा योजना | प्रधान सचिव (सा आ व कु क) | मुख्य सचिव |
| ३ | संचालक आरोग्य सेवा | प्रधान सचिव (सा आ व कु क) | मुख्य सचिव |
| ४ | मुख्य कार्यकारी अधिकारी, राजीव गांधी जीवनदायी योजना | प्रधान सचिव (सा आ व कु क) | मुख्य सचिव |
| ५ | प्रकल्प संचालक, महाराष्ट्र एडस् नियंत्रण सोसायटी | प्रधान सचिव (सा आ व कु क) | मुख्य सचिव |
| ६ | आयुक्त कुटुंब कल्याण तथा संचालक राष्ट्रीय आरोग्य अभियान यांचे अधिपत्याखाली कार्यरत सहसंचालक व उप संचालक | आयुक्त कुटुंब कल्याण तथा संचालक राष्ट्रीय आरोग्य अभियान | प्रधान सचिव (सा आ व कु क) |
| ७ | मुख्य कार्यकारी अधिकारी, राजीव गांधी जीवनदायी योजना यांच्या अंतर्गत कार्यरत उप मुख्य कार्यकारी अधिकारी, वित्तीय सल्लगार व सहायक संचालक | मुख्य कार्यकारी अधिकारी, राजीव गांधी जीवनदायी योजना | प्रधान सचिव (सा आ व कु क) |
| ८ | प्रकल्प संचालक, महाराष्ट्र एडस् नियंत्रण सोसायटी यांच्या अंतर्गत कार्यरत सहसंचालक व उप संचालक | प्रकल्प संचालक, महाराष्ट्र एडस् नियंत्रण सोसायटी | प्रधान सचिव (सा आ व कु क) |
| ९ | अतिरिक्त् संचालक, आरोग्य संस्थामार्फत राबविण्यात येणारे कार्यक्रम | संचालक आरोग्य सेवा | प्रधान सचिव (सा आ व कु क) |
| १० | अतिरिक्त् संचालक, सामाजिक बांधिलकी असलेले कार्यक्रम | आयुक्त कुटुंब कल्याण तथा संचालक राष्ट्रीय आरोग्य अभियान | प्रधान सचिव (सा आ व कु क) |

| | | | |
|---|---|---|---|
| ११ | संचालक आरोग्य सेवा यांचे अधिपत्याखाली कार्यरत सर्व सहसंचालक | संचालक आरोग्य सेवा | प्रधान सचिव (सा आ व कु क) |
| १२ | सहसंचालक (कुष्ठरोग व क्षयरोग) | संचालक आरोग्य सेवा | प्रधान सचिव (सा आ व कु क) |
| १३ | सहसंचालक (हिवताप, हत्तीरोग व जलजन्य रोग) | संचालक आरोग्य सेवा | प्रधान सचिव (सा आ व कु क) |
| १४ | उपसंचालक<br>(कुटुंब कल्याण) | आयुक्त कुटुंब कल्याण तथा संचालक राष्ट्रीय आरोग्य अभियान | प्रधान सचिव (सा आ व कु क) |
| १५ | उर्वरीत सर्व उपसंचालक, आरोग्य सेवा संचालनालय / परिमंडळे / परिवहन / माहिती /शिक्षण व संपर्क / कुष्ठरोग व क्षयरोग / हिवताप, हत्तीरोग व जलजन्य रोग / सांख्यिकी | संचालक आरोग्य सेवा | प्रधान सचिव (सा आ व कु क) |
| १६ | आयुक्त राज्य कामगार विमा योजना यांच्या अधिपत्याखालील कार्यरत अधिकारी | आयुक्त राज्य कामगार विमा योजना | प्रधान सचिव (सा आ व कु क) |